सहवीज निर्मिती प्रकल्प राबविण्यासाठी सहकारी साखर
कारखान्यांना शासकीय भागभांडवल मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग
शासन निर्णय क्रमांक : ससाका-४४०६ /प्र.क्र.७३ /भाग-७/ ३-स
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०११.

**वाचा** :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग समक्रमांक , दिनांक २० फेब्रुवारी, २००८, ६ मार्च, २००८ , २४ मार्च, २००८, १ सप्टेंबर, २००८, ३ जून, २००८ , १९ मार्च, २००९ व ३० जानेवारी, २०१०

२) शासन शुध्दीपत्रक समक्रमांक दिनांक २३ जुलै, २००९.

३) शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक : अपाऊ-२००७/प्र.क्र.६९३ / ऊर्जा-७, दिनांक १४ ऑक्टोबर, २००८.

४) शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक : अपाऊ-२००९/प्र.क्र.१५२८/ऊर्जा-७, दिनांक ३ ऑगस्ट, २००९.

५) शासन पूरकपत्र उद्योग ऊर्जा व कामगार विभाग क्र. अपाऊ २०१०/प्र.क्र. ३६०/ उर्जा ७, दि. ३ मार्च, २०११

**प्रस्तावना** :-

उपरोक्त संदर्भ क्रमांक १ येथील दिनांक २० फेब्रुवारी, २००८ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील सहकारी साखर कारखान्यांमार्फत सहवीज निर्मिती प्रकल्प राबविण्याचे धोरण निश्चित करण्यात आले आहे. या धोरणानुसार राज्यात सहकारी साखर कारखान्यांच्या माध्यमातून येत्या तीन वर्षात सहवीज निर्मिती प्रकल्पांमधून १००० मे. वॅट वीजनिर्मिती करण्याचे उद्दिष्ट ठरविण्यात आले आहे. तसेच या धोरणानुसार सहवीज निर्मिती प्रकल्प राबविणाऱ्या सहकारी साखर कारखान्यांना प्रकल्प खर्चाच्या ५% शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येणार आहे. त्या अनुषंगाने प्रकल्प उभारणी व समन्वय समितीने सहवीज प्रकल्पाला आर्थिक व प्रशासकीय मान्यता दिलेल्या **कर्मयोगी शंकररावजी पाटील सहकारी साखर कारखाना म.,जि.पुणे** या सहकारी साखर कारखान्याला देय असलेले ५ % शासकीय भागभांडवल मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दिनांक २० फेब्रुवारी, २००८ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील सहकारी साखर कारखान्यामार्फत सहवीज निर्मिती प्रकल्प राबविण्याबाबतचे धोरण निश्चित करण्यात आले आहे. सदर धोरणाची अंमलबजावणी परिणामकारकरित्या व्हावी म्हणून दि. ६ मार्च, २००८ च्या शासन निर्णयान्वये साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अध्यक्षतेखाली प्रकल्प उभारणी व समन्वय समिती गठित करण्यात आली आहे. सदर समितीने सहवीज निर्मिती प्रकल्प राबविण्यास प्रशासकीय,

तांत्रिक व आर्थिक मान्यता दिलेल्या **कर्मयोगी शंकररावजी पाटील सहकारी साखर कारखाना म.,**यांना रुपये १६१.५५ लाख (रु. एक कोटी एकसष्ट लाख पंचावन्न हजार फक्त) एवढे शासकीय भागभांडवल मंजूर करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. सदर मंजूरीच्या अटी व शर्ती सोबतच्या परिशिष्ट 'अ' मध्ये नमूद करण्यात आल्या आहेत.

२. या बाबीसाठी सन २०१०-११ च्या अंदाजपत्रकात रुपये ३५,००,००,०००/- एवढी तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली होती. आता सुधारीत अंदाजपत्रकात रु २०.०० कोटी एवढी तरतूद उपलब्ध करुन देण्यात आली आहे. त्यापैकी रुपये १६१.५५ लाख (रुपये एक कोटी एकसष्ट लाख पंचावन्न हजार फक्त) एवढी तरतूद बीडीएसवर उपलब्ध करुन देण्यात आली आहे. त्यानुसार सदर तरतूद खालील सहकारी साखर कारखान्याला देय असलेल्या भागभांडवलापोटी खालीलप्रमाणे वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**(रुपये लाखात)**

| **अ. क्र** | **सहकारी साखर कारखान्यांची नावे** | **सहवीज निर्मिती प्रकल्प किंमत** | **५% प्रमाणे शासनाकडून मिळावयाच्या भागभांडवलाची रक्कम** | **या आर्थिक वर्षात मंजूर करावयाचे भागभांडवल** |
|---|---|---|---|---|
| १ | **कर्मयोगी शंकररावजी पाटील सहकारी साखर कारखाना म., जि.पुणे.** | ३२३०.९५ | १६१.५५ | १६१.५५ |
| | **एकूण** | | १६१.५५ | १६१.५५ |

३. या बाबीसाठी सन २०१०-११ च्या सुधारीत अंदाजपत्रकात एकूण रुपये२०००.०० लाख एवढी तरतूद उपलब्ध आहे. या उपलब्ध तरतूदीमधून उपरोक्त खर्च भागविण्यात यावा व खालील लेखाशीर्षाखाली खर्ची घालण्यात यावा :-

मागणी क्रमांक व्ही. ३,
४४२५,सहकारावरील भांडवली खर्च,
(१०८), इतर सहकारी संस्थांमधील गुंतवणुका -
सहकारी साखर कारखाने,
(०३) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना,
(०३) (०३) सहकारी साखर कारखान्यांना सहवीज निर्मितीसाठी
भागभांडवली अंशदान (४४२५ २१७२)
५४- गुंतवणुका

४. उद्योग, ऊर्जा विभाग व कामगार विभागाने सहवीज निर्मिती प्रकल्पाबाबत दिनांक ३ मार्च २०११ च्या शासन पूरक पत्रान्वये निर्गमित केलेल्या अटी व शर्ती जशाच्या तशा लागू राहतील.

५. राज्यातील सहकारी साखर कारखान्यांना सहवीज निर्मिती प्रकल्पासाठी शासकीय भागभांडवलाची रक्कम रुपये १६१.५५ लाख (रु. एक कोटी एकसष्ट लाख पंचावन्न हजार फक्त) वितरित करण्याकरीता श्री. य. गं. पाटील, कार्यासन अधिकारी, रोखशाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना या आदेशाद्वारे आहरण व संवितरण अधिकारी तसेच, श्री.गो.ना.रणखांबे, सह सचिव, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यास अनुसरुन आहरण व संवितरण अधिकारी यांनी उपरोक्त रक्कम आहरण करुन सदर रक्कमेचा धनादेश खालील सहकारी साखर कारखान्यांच्या नावे त्याच्यासमोर दर्शविलेल्या रक्कमेप्रमाणे काढण्यात यावा :-

| अ.क्र. | कारखान्याचे नांव | या आर्थिक वर्षात मंजूर करावयाचे भागभांडवल (रुपये लाखात) |
|---|---|---|
| १ | **कर्मयोगी शंकररावजी पाटील सहकारी साखर कारखाना म., जि.पुणे.**<br>Karmayogi Shankarraoji Patil Sahakari Sakhar Karkhana Ltd., Dist.Pune. | 161.55 |
| | **एकूण** | 161.55 |

६. सदर रक्कमेचा विनियोग कारखाना आवश्यक त्या बाबीकरीताच करीत आहे. याबाबतचे नियंत्रण साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी ठेवावे व याबाबतचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करावा. शासकीय भागभांडवलाची रक्कम कारखान्यांना वितरित करण्यापूर्वी सोबत जोडलेल्या परिशिष्ट "अ" मधील अटी व शर्ती कारखान्यांस बंधनकारक असल्याचे आहरण व संवितरण अधिकाऱ्याने कारखान्याकडून लिहून घ्यावे. तसेच सदर कारखान्यांनी त्यांना मंजूर केलेल्या शासकीय भागभांडवलाचा विनियोग दाखला साखर आयुक्तालयामार्फत शासनास सादर करावा. सदर भागभांडवलाच्या परतफेडीसाठी संबंधित सहकारी साखर कारखान्यांकडून भागभांडवल विमोचन निधी अटी व शर्तीनुसार दरवर्षी योग्य त्या प्रमाणात जमा होतो किंवा नाही याची तपासणी सहसंचालक (उप पदार्थ), साखर आयुक्तालय यांच्यामार्फत करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्र.२०२/११/व्यय-२, दिनांक ३०-३-२०११ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८.		सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या बेवसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०११०३३११७१२१९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( पां. स. देवकर )
अवर सचिव , महाराष्ट्र शासन
सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री.
२) सर्व मंत्री / राज्यमंत्री.
३) प्रधान महालेखाकार, (लेखापरीक्षा-१ / २), महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
४) प्रधान महालेखाकार Vaucher Level Computer Section ( V L C ), मुंबई.
५) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
६) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली.
८) संचालक, साखर विकास निधी, कृषि भवन, नवी दिल्ली.
९) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ म., साखर भवन, ११ वा मजला, प्लॉट नं, २३०, नरिमन पॉईंट, मुंबई.
१०) महासंचालक, वसंतदादा साखर संशोधन संस्था, पुणे.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, मुंबई.
१२) संचालक (तांत्रिक) , महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनी, प्रकाशगड, मुंबई.
१३) महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण (मेडा), पुणे.
१४) प्रतिनिधी, इंडियन इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी, पवई, मुंबई.
१५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या., मुंबई.
१६) कार्यकारी संचालक, कर्मयोगी शंकररावजी पाटील सहकारी साखर कारखाना म., इंदापूर, जि.पुणे
१७) विशेष लेखा परिक्षक (वर्ग- १), सहकारी संस्था, (साखर), पुणे.
१८) प्रादेशिक सहसंचालक (साखर), पुणे.
१९) कार्यकारी संचालक, मिटकॉन, कुबेरा चेंबर्स, डॉ. राजेंद्र प्रसाद मार्ग, शिवाजीनगर, पुणे.
२०) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
२१) कार्यासन अधिकारी (रोखशाखा) / सह सचिव ( साखर ), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२
२२) ऊर्जा विभाग - ऊर्जा-१ व ऊर्जा - ७, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
२३) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
२५) वेब को-ऑर्डिनेटर, कक्ष अधिकारी, १६-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.
२६) कक्ष अधिकारी - १३-स / १७-स / २५- स.
२७) निवड नस्ती, ३ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.